**आपले सरकार सेवा केंद्रांचे व्यवस्थापन महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळाकडे सोपविणे बाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन (माहिती तंत्रज्ञान) विभाग**
**शासन निर्णय क्र. मातंसं१७१६/प्र.क्र.५१७/३९**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ०५ डिसेंबर, २०१६

**संदर्भ :-** १) शासन निर्णय क्रमांक क्र. मातंसं/प्र.क्र.२८/३९, दिनांक :- ३ डिसेंबर, २००८
२) शासन निर्णय क्रमांक क्र. मातंसं २०१२/प्र.क्र.१५२/३९, दिनांक २३ मे, २०१२
३) शासन निर्णय क्रमांक क्र. मातंसं ०४७/१/२०१४/३९, दिनांक ५ सप्टेंबर, २०१४
४) शासन निर्णय क्रमांक क्र. मातंसं १७१६/प्र.क्र.२८६/३९, दिनांक ९ ऑगस्ट, २०१६

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या राष्ट्रीय ई गव्हर्नन्स कृती कार्यक्रमांतर्गत राज्यातील ग्रामीण व शहरी भागात नागरिकांपर्यंत शासकीय, निमशासकीय व खाजगी सेवा पोहोचविण्यासाठी कॉमन सर्व्हीस सेंटर योजना राज्यात सन २००८ पासून सुरु झाली. संदर्भ क्र. १ व ३ च्या शासन निर्णयान्वये राज्यात १३०७४ केंद्र मंजूर करण्यात आले असून त्यापैकी सुमारे ६००० केंद्र सध्या कार्यान्वित आहेत. सन २०१५ पासून कॉमन सर्व्हीस सेंटर हे आपले सरकार सेवा केंद्र या कॉमन ब्रँडींग अंतर्गत कार्यरत आहेत.

या योजनेंतर्गत ४ सर्व्हीस सेंटर एजन्सीची निवड निविदा प्रक्रियाद्वारे करण्यात आली होती. सन २००८ मध्ये औरंगाबाद व अमरावती महसुल विभागात सी एम एस., कोकण व पुणे विभागात स्पॅनको , नाशिक विभागात बेसीक्स व नागपूर विभागात रिलायन्स कम्युनिकेशन या कंपन्यांची सर्व्हीस सेंटर एजन्सी म्हणून निवड करण्यात आली होती. सन २०१३ मध्ये रिलायन्स कम्युनिकेशन या कंपनीचे कंत्राट रद्द करुन महाऑनलाईन लि. यांना नागपूर विभागात सर्व्हीस सेंटर एजन्सी म्हणून नियुक्त करण्यात आले. दि.१.८.२०१५ रोजी सर्व सर्व्हीस सेंटर एजन्सी यांचे कंत्राट संपुष्टात आले आहेत.

केंद्र शासनाने डिसेंबर २०१५ मध्ये CSC २.० बाबत मार्गदर्शक सुचना निर्गमित केलेल्या आहेत. या सुधारित मार्गदर्शक सुचनांतर्गत सर्व्हीस सेंटर एजन्सीची संकल्पना संपुष्टात येवून कॉमन सर्व्हीस सेंटर योजनेची अंमलबजावणी राज्य शासनामार्फत नियुक्त संस्थेद्वारे करणे अपेक्षित आहे.

संदर्भ क्र. ४ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळाची स्थापना करण्यात आली असून त्या शासननिर्णयातील परिच्छेद क्र. ३.१ नुसार महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळावर राज्यव्यापी माहिती तंत्रज्ञान प्रकल्पांच्या व्यवस्थापनाची जबाबदारी सोपविण्यात आली आहे. त्यानुसार आपले सरकार सेवा केंद्रांच्या व्यवस्थापनाची जबाबदारी महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळावर सोपविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

CSC २.० च्या मार्गदर्शक सुचनेनुसार सर्व्हीस सेंटर एजन्सीची संकल्पना संपुष्टात आली असल्याने, दिनांक ३०.९.२०१६ रोजी झालेल्या १०५ व्या उच्चाधिकार समितीच्या बैठकीत झालेल्या निर्णयानुसार “आपले सरकार सेवा केंद्र” यांच्या व्यवस्थापनाची जबाबदारी या शासन निर्णयाच्या दिनांकापासून महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळावर सोपविण्यात येत आहे.

संदर्भ क्र. २ च्या शासन निर्णयानुसार सेवा शुल्काच्या रकमेत आतापर्यंत सर्व्हीस सेंटर एजन्सी यांना देय हिस्सा या शासन निर्णयाच्या तारखेपासून महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळाला देय राहिल. महाऑनलाईन लि. मार्फत सदर रक्कम महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळाच्या खात्यात नियमितपणे जमा करण्यात यावी.

आपले सरकार सेवा केंद्राच्या केंद्र चालकांसाठी आवश्यक असलेल्या वॉलेट प्रणालीच्या वापराबाबत महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळ व महाऑनलाईन लि. यांच्यामध्ये स्वतंत्रपणे करार करण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२०५१९१०३९५०११ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shubhangi Bharat Shedge

Digitally signed by Shubhangi Bharat Shedge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=GAD (IT), postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a263d4760021d05a3b756165e3bb70be2ff107e40ff26cb633435468b5238f5e, cn=Shubhangi Bharat Shedge
Date: 2016.12.05 19:19:26 +05'30'

**( शु.भ. शेडगे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

मा.राज्यपाल यांचे सचिव.
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव,
मा. राज्यमंत्री (माहिती तंत्रज्ञान) यांचे खाजगी सचिव,
सर्व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
सर्व अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव /विशेष सचिव / सचिव
प्रधान सचिव (माहिती तंत्रज्ञान), मंत्रालय, मुंबई-३२,
* प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त, महाराष्ट्र राज्य,
अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र आय.टी. कॉर्पोरेशन लि., मुंबई.
सर्व जिल्हाधिकारी/ सर्व महानगरपालिका आयुक्त/ सर्व जिल्हा परिषद/ नगर पालिका यांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
वित्त विभाग (व्यय-४), मंत्रालय, मुंबई -३२,
महालेखापाल १/२ लेखा व अनुज्ञेयता महाराष्ट्र, मुंबई /नागपूर,
महालेखापाल १/२ लेखा परीक्षा महाराष्ट्र, मुंबई /नागपूर,
महालेखापाल , (वाणिज्यिक लेखा), महाराष्ट्र, मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
मुख्य परिचालन अधिकारी, महाऑनलाईन लि. मुंबई
मुख्य परिचालन अधिकारी, सी एम एस लि., / मे.बेसीक्स लि. / मे. स्पॅनको लि.
निवड नस्ती.